नको नकोशा आठवणी
ऐन बालपणात कविता जोरजोराने म्हणत
शाळेतून परतताना
गाईने ढुशी मारल्याच्या
संध्याकाळची जांभळी
फुल टिपत असताना कोणाचा तरी वेंधळा पाय पडून
वयाची कोवळी काच फुटत गेल्याच्या नकोश्या नकोश्या आठवणी
त्याला ऐकू येतात ऐन उन्हाळ्यात
पाचोळ्यातून चालत गेलेल्या बालपणीच्या
तांबूस पायांचे आवाज
आणि नंतर प्रत्येक आघाताप्रमाणे
पांढऱ्या पडत जाणाऱ्या कानाजवळच्या
केसांचे फडफडणे.

त्याने खूप खस्ता खाल्ल्यात देशभक्ताप्रमाणे
गाव सोडताना मनाचे तेल होऊन
घरंगळले त्यांच्या दोन्ही भुवयांवर
आणि एस्.टी वळताना म्हातारे शेत वडिलांच्या दाढीसारखे
खरखरले त्यांच्या गालाला.

गावी परतल्यावर त्याने काहीच
सांगितले नाही ओटीवर मित्र जमले तेव्हा
लपवले त्याने शहराच्या हकीकतीतून
मोर्चा युनिव्हर्सिटीकडे आला तेव्हा
त्याला झेंडा पुसण्याच्या हातात सरकवून
बियर प्यावीशी वाटले ते
किंवा भेंडीबाजारात एक गाडीवाला
"पॅन्ट लेनीही, पडेगी भडवे नही तो
XX काटूंगा" असे अर्वाच्च बडबडला तेही.

त्याने खूप सांगितल्या गोष्टी बक्षिसांच्या,
पेपरात फोटो छापून आल्याचे
कौतुक किंवा नाटकात त्याच्याच एन्ट्रीला
फ्यूज उडाल्याची गंमत.

त्याने पुन्हा सर्वांना माहीत असलेली
सहलीला गेल्यावर कड्यावरून घसरताना
एका निसर्गकवीच्या ओळी आठवल्याची
जुनीच आठवण सांगितली. नव्या ओटीवर.

शाळेतल्या कविता
पाठ म्हणून दाखवल्या त्याने
आणि विचारले वडीलकीच्या आवाजात
वर्गातल्या मंगळचे नंतर काय झाले
शाळा सोडल्यावर ते —

सर्व मित्र निघून गेल्यावर
कंदिलाच्या काळोखात त्याने स्वतःलाच
मित्र समजून हळूच
शृंगाराच्या ऐन रात्री
मेणबत्तीवर हात पडून भाजल्याचे
सांगितले खाजगी होत.

त्याला
जुन्या
पिडक

खूप
खूप
हाता

त्याला आता कौलांवर बुजगावण्यासारख्या
उभ्या असलेल्या ॲन्टेना सारखे
पिडले आहे स्वतःच्या चरित्रानेही.

खूप कविता जमविल्या त्याने
खूप कारणे पण
हाताशी येता येता गगरित
हे आकाशाचे ताट खूप उंच
उडून गेलेच एवढेच जाणवते
त्याला स्वतःच्या कोवळ्या चरित्रातून
चालताना...



नको नकोशा आठवणी
ऐन बालपणात कविता जोरजोराने म्हणत
शाळेतून परतताना
गाईने ढुशी मारल्याच्या
संध्याकाळची जांभळी
फूल टिपत असताना कोणाचा तरी वेंधळा पाय पडून
वेण्याची कोवळी काच फुटत गेल्याच्या नकोश्या नकोश्या आठवणी
त्याला ऐकू येतात ऐन उन्हाळ्यात
पाचोळ्यातून चालत गेलेल्या बालपणीच्या
तांबूस पायांचे आवाज
आणि नंतर प्रत्येक आघाताप्रमाणे
पांढऱ्या पडत जाणाऱ्या कानाजवळच्या
केसांचे फडफडणे.

त्याने खूप खस्ता खाल्ल्यात देशभक्ताप्रमाणे
गाव सोडताना मनाचे तेल होऊन
घरंगळले त्यांच्या दोन्ही भुवयांवर
आणि एस्.टी वळताना म्हातारे शेत वडिलांच्या दाढीसारखे
खरखरले त्यांच्या गालाला.

गावी परतल्यावर त्याने काहीच
सांगितले नाही ओटीवर मित्र जमले तेव्हा
लपवले त्याने शहराच्या हकीकतीतून
मोर्चा युनिव्हर्सिटीकडे आला तेव्हा
त्याला झेंडा दुसऱ्याच्या हातात सरकवून
बियर प्यावीशी वाटले ते
किंवा भेंडीबाजारात एक गाडीवाला
"पॅन्ट लेनीही, पडेगा भड्वे नहीं तो
xx काटूंगा" असे अर्वाच्य बडबडला तेही.

त्याने खूप सांगितल्या गोष्टी बक्षिसांच्या,
पेपरात फोटो छापून आल्याचे
कौतुक किंवा नाटकात त्याच्याच एन्ट्रीला
फसून उडाल्याची गंमत.

त्याने पुन्हा सर्वांना माहीत असलेली
सहलीला गेल्यावर कड्यावरून घसरताना
एका निसर्गकवीच्या ओळी आठवल्याची
जुनीच आठवण सांगितली. नव्या ओटीवर.

शाळेतल्या कविता
पाठ म्हणून दाखवल्या त्याने
आणि विचारले वडीलकीच्या आवाजात
वर्गातल्या मंगेशचे नंतर काय झाले
शाळा सोडल्यावर ते—

सर्व मित्र निघून गेल्यावर
कंदिलाच्या कोळोखात त्याने स्वतःलाच
मित्र समजून हळूच
शृंगाराच्या एका रात्री
मेणबत्तीवर हात पडून भाजल्याचे
सांगितले रंगेल होत.




त्याला आता कौलांवर कुजगावल्यासारख्या
कुजत असलेल्या आठवणींसारखे
पिडले आहे स्वतःच्या चरित्रानेही.

खूप कविता जमविल्या त्याने
खूप कागदे पण
हाताशी येता येता गगनात
हे आकाशाचे ताट खूप उंच
उडून गेलेच एवढेच जाणवते
त्याला स्वतःच्या कोवळ्या चरित्रातून
चालताना...

कालनिर्णय